एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये (CPTP) परिविक्षाधीन नियुक्तीवर असलेल्या गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांना घरभाडे भत्ता व वाहतुक भत्ता अनुज्ञेय करणेबाबत-

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-१११४/प्र.क्र.९६/१४/१८-ब**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : २० एप्रिल, २०१५

**संदर्भ :-**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.१.२०१४.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-२०१४/प्र.क्र.९९/१४/१२-अ,दिनांक ९.५.२०१४.

३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-०५१४/प्र.क्र.१८/१८-ब, दि.८.८.२०१४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सरळसेवेने गट-अ आणि गट-ब मध्ये नियुक्त होणाऱ्या विविध १९ संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी दोन वर्ष कालावधीचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे यशदा, पुणे व वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थांमध्ये सुरु करण्याचा निर्णय शासनाने उपरोक्त संदर्भ क्रमाक १ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे.

२. या संपूर्ण कार्यक्रमातील संस्थेमधील प्रशिक्षण कालावधीसाठी जसे, पायाभूत प्रशिक्षण, अनिवार्य संलग्नता, महाराष्ट्र दर्शन व दिल्ली भेट या भागांमध्ये प्रशिक्षण संस्थेमार्फत मोफत निवास व प्रवासाची सुविधा उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. तथापि, पायाभूत प्रशिक्षण व अनिवार्य संलग्नतेनंतर ७४ आठवडयांच्या विभागांतर्गत तांत्रिक व खातेनिहाय प्रशिक्षणाचे कालावधीत प्रशिक्षणार्थींना निवास व प्रवासाची सुविधा नसल्याने, प्रशिक्षणार्थींना स्वत:च यासाठी व्यवस्था करावी लागणार आहे. त्याअनुषंगाने विचार करता सदर दोन वर्षाच्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीत परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांना घरभाडे भत्ता आणि प्रवासभत्ता अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याप्रकरणी शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण घेत असलेल्या परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांना पुढील अटींच्या पुर्ततेच्या अधिन राहून घरभाडे भत्ता आणि प्रवासभत्ता अनुज्ञेय राहील.

१. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण घेत असलेल्या प्रशिक्षणार्थींना ज्या कालावधीत प्रशिक्षण संस्था किंवा शासनामार्फत निवासाची व प्रवासाची व्यवस्था करण्यात येत नसेल, त्या कालावधीत प्रशिक्षणार्थींना प्रचलित दराने घरभाडे भत्ता व प्रवासभत्ता अनुज्ञेय राहील.
२. प्रशिक्षण कालावधीत निवास व प्रवासाची व्यवस्था प्रशिक्षण संस्थेमार्फत अथवा शासनामार्फत करण्यात येत असल्यास, त्यांना घरभाडे भत्ता व प्रवासभत्ता अनुज्ञेय होणार नाही.
३. जे प्रशिक्षणार्थी गैरहजर असतील त्यांना त्या कालावधीसाठी घरभाडे भत्ता व प्रवासभत्ता अनुज्ञेय असणार नाही. ही रक्कम मिळण्यासाठी सदर प्रशिक्षणार्थी सर्व दिवस प्रशिक्षणास हजर असल्याबाबत त्यांचे सत्र समन्वयक यांनी तर निवासी प्रशिक्षण असल्यास, संबंधीत प्रशिक्षण संस्थेने प्रमाणित करुन देणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३८/सेवा-५, दि. ०२.०३.२०१५ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०१५०४२०१७५६३३५९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridas Bhogle

Digitally signed by Santosh Haridas Bhogle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Haridas Bhogle
Date: 2015.04.20 18:08:12 +05'30'

**( डॉ.संतोष भोगले )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (वित्त),लेखा व कोषागारे, मंत्रालय, मुंबई-३२
३. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (** पत्राद्वारे)
५. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), व्ही.आय.पी.रोड, धरमपेठ,नागपूर
६. सहसचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. उप सचिव (व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. निवडनस्ती- कार्यासन १८-ब